**करंबळी, ता.भुदरगड, जि.कोल्हापूर या को.प. बंधा-याची विशेष दुरुस्तीच्या कामास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव**

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग

**शासन निर्णय क्रमांकः प्रमा २०१४/( ४६८ /१४)/ सिंव्य(कामे)**

मंत्रालय, मुंबई

तारीख: २० /०८/२०१४

**वाचा**

कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ,पुणे यांचे पत्र क्रमांक मकृखोविम/२०९/(३६४/०९) /प्रशा ३/ ६१८९ दि.१२.८.२०१४

**प्रस्तावना**

कोल्हापूर जिल्ह्यातील भुदरगड तालुक्यातील वेदगंगा नदीवर पाटगांव मध्यम पाटबंधारे प्रकल्प पूर्ण झालेला आहे. प्रकल्पांतर्गत सिंचनासाठी एकूण १७ को.प. बंधारे बांधण्यात आले. सदर १७ बंधा-यांद्वारे पाटगांव प्रकल्पांतर्गत ८१०० हे. इतकी सिंचन क्षमता/ १२०७० हे. पिकक्षेत्र निर्मिती झाली आहे. सदरच्या बंधा-यांची बांधकामे १५ ते २५ वर्षापूर्वी झालेली आहेत. त्यामध्ये कंरबळी या को.प. बंधा-याचा समावेश आहे. पाटगांव प्रकल्प हा कोल्हापूर जिल्ह्यातील सर्वात जास्त पावसाच्या भागामध्ये येत असून धरणाच्या पाणलोट क्षेत्रात ४००० मि.मी. ते ६००० मि.मी. इतके वार्षिक पर्जन्यमान आहे. या ठिकाणी पावसाची तिव्रता व नदीचा उतार जास्त असलेमुळे तसेच नदीच्या प्रवाहाला प्रचंड वेग असल्याने या को.प. बंधा-याचे दगडी स्तंभाना वर्षानुवर्षे हानी होऊन स्तंभ कोसळत आहेत. यापैकी किरकोळ स्वरुपाची दुरुस्तीची कामे व्यवस्थापन विभागाकडून करण्यात येतात. परंतू या को.प. बंधा-यांची पडझड होत जाऊन स्तंभ व स्लॅब सन १९९७ मध्ये पूर्णतः कोसळलेले असलेने पाणीसाठा करता येत नाही. त्यामुळे या को.प. बंधा-यांची पुनर्बांधणी करणे अत्यावश्यक आहे. बंधा-यांमध्ये सद्यस्थितीत पाणीसाठा करता येत नसलेमुळे बंधा-याखालील प्रकल्पिय ३१४ हे. क्षेत्र सिंचनाखाली आणणेचे उद्दिष्ट साद्य होत नाही. तसेच को.प.बंधारा दुरुस्तीसाठी लाभधारक, शेतकरी व लोकप्रतिनिधींची आग्रहाची मागणी आहे. वरील सर्व बाबीचा विचार करुन प्रशासकीय मान्यता देण्याचा विचार शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय**

या शासन निर्णयाव्दारे विस्तार व सुधारणा योजनेंअंतर्गत करंबळी, ता.भुदरगड, जि.कोल्हापूर या को.प. बंधा-याची विशेष दुरुस्तीच्या कामास रु. १९१.८१ लक्ष (कामावरील खर्च रु १८२.५७ लक्ष व रु ९.२४ लक्ष अनुषंगिक खर्च) च्या खर्चास खालील अटीच्या अधीन राहुन सोबतच्या परिशिष्टा प्रमाणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे

१)को प बंधाऱ्याची पुर्नबांधणी करतांना असतित्वातील को प बंधाऱ्याचे वापरायोग्य बांधकाम साहित्य (उदा. लोखंडी फळया Needle) चा वापर करण्यात यावा.

२) शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २००९/(४६५/०९)/मो.प्र-२, दि.१५.०१.२०१० मधील अटींच्या अधिन राहून कामांची दुरुस्ती करण्यात यावी .

३) सदरची कामे कार्यारंभ आदेश काढल्यापासून कामे पूर्ण होईपर्यत त्रैमासीक प्रगती अहवाल शासनास सादर करावा.

४). प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व प्रशासकीय मान्यतेच्या तरतूदीच्या मर्यादेत पुर्ण करण्यात यावे. ही कामे करण्याकरीता भौतिक व आर्थीक नियोजन करुन कार्यपूर्तेतीबाबत विविध टप्यांचे दिनांकासहीत (Miles Stones) निर्धारित करण्यात यावे. सदर दिनांकानुसार miles stone साध्य करणे अपेक्षित असून जर त्यात दिरंगाई झाल्यास दंड (Penalty) आकारण्याची व लवकर साध्य झाल्यास प्रोत्साहन (Incentive) देण्याची तरतूद निविदेमध्ये करण्यात यावी .

५) यांत्रिकी संघटनेमार्फत करता येण्यासारखी विशेष दुरुस्तीचे काम यांत्रिकी विभागाकडूनच करुन घेण्यात यावे

६) काम पूर्ण झाल्यानंतर त्याचे पुर्णत्व अहवाल व प्रमाणपत्र (Completion Report & Certificate) शासनास सादर करावे

. या कामावर होणारा खर्च ४७०२ लघु पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, (योजनांतर्गत) विस्तार व सुधारणा (१०)(०१ ) महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०२ ७४५२) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याखाली उपलब्ध होणाऱ्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र३३ सन २०१४-१५ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

हा शासन निर्णय (वित्त विभाग) क्र विअप्र १०.०८/प्रक्र ७०/२००८/विनियम, दि.१५.५.२००९ मधील भाग- पहिला उपविभाग -३ मधील अ.क्र.४(२७ (२) मध्ये विहित केल्यानुसार अनावर्ती खर्चाच्या बाबतीत रु ५.०० कोटीपर्यत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार संबधित विभागास प्रदान केले आहेत. त्या अधिकारानुसार आंतर वित्तीय सल्लागाराच्या सहमतीने हे आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२०१७०५५९१९२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2014.08.20 18:53:56 +05'30'

कि.ल.संखे
शासनाचे कक्ष अधिकारी

**प्रत,**

१. महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई

४. मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
५. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
७. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई,
८. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम), मंत्रालय, मुंबई,
९. स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई,
१०.स्वीय सहायक, प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११.स्वीय सहायक, प्रधान सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ, पुणे
१३.मुख्य अभियंता(पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४.मुख्य अभियंता, (यांत्रिकी) जलसंपदा विभाग, नाशिक
१५. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे
१६.आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७.माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१८.उप सचिव, (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९.अधीक्षक अभियंता,कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर
२०.अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ(व्दारे), पुणे- १
२१.अवर सचिव (सिंव्य/कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२.कार्यकारी अभियंता, मुख्य व्दार उभारणी पथक क्र ५, नाशिक
२३.उप अभियंता, सिंव्य(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४.ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
२५.सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक प्रमा २०१४/(४६८/१४)/ सिंव्य(कामे) दिनांक २० .८.२०१४ चे प्रपत्र

परिशीष्ट

| अ.क्र | लेखाशीर्ष | अंदाजीत खर्च (लक्ष रुपये ) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | २ | ३ |
| १) | सी- कामे | १८२.५७ |
| | **एकूण** | १८२.५७ |
| | अनुषंगिक खर्च १० टक्के | ९.२४ |
| | **एकूण** | १९१.८१ |

Kirankumar Laxman Sankhe

Digitally signed by Kirankumar Laxman Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kirankumar Laxman Sankhe
Date: 2014.08.20 18:54:25 +05'30'

**कि.ल.संखे**
शासनाचे कक्ष अधिकारी